महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मधील
अधिकाऱ्यांच्या बदल्या / नियुक्त्या.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
## शासन आदेश क्रमांक : मविसे-१०१७/प्र.क्र.३२/२०१७/आस्था-३,

बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, मुंबई- ४०० ००१.
तारीख: २४ एप्रिल, २०१७.

**शासन आदेश-**

सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतूदींनुसार सदर अधिनियमाच्या कलम ४ (४) मधील तरतूदींनुसार सक्षम प्राधिकाऱ्याच्या पूर्वमान्यतेने या विभागातील श्री.आर.यु. शिंदे, उप आयुक्त (आस्थापना), विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई यांची या आदेशान्वये अतिरिक्त संचालक, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, नवी मुंबई या पदावर प्रतिनियुक्तीने पदस्थापना करण्यात येत आहे. तसेच उप आयुक्त (आस्थापना) आणि उप आयुक्त (विकास), विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण विभाग, नवी मुंबई ही दोन्ही पदे रिक्त रहात असल्याने सदर दोन्ही पदांचा अतिरिक्त कार्यभार श्री.आर.यु. शिंदे, अतिरिक्त संचालक, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, नवी मुंबई यांच्याकडे पुढील आदेश होईपर्यंत सुपूर्द करण्यात येत आहे.

२. श्री.आर.यु. शिंदे यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा. तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक: सीडीआर १०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

३. श्री.आर.यु. शिंदे यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ हजर व्हावे व पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास कळवावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४२४१६०६३९८१२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vijay Dattatraya Shinde

Digitally signed by Vijay Dattatraya Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fabf0ce38fdf553beb949764920592a97832b6399cb7060200d032e127e455f1, cn=Vijay Dattatraya Shinde
Date: 2017.04.24 16:50:00 +05'30'

( वि.द. शिंदे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२. मा.मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
३. मा.राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
४. मा.सचिव (ग्राम विकास व पंचायत राज) यांचे स्वीय सहायक.
५. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई.
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, नवी मुंबई
७. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
८. श्री.आर.यु. शिंदे, उप आयुक्त (आस्थापना), विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई (विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई यांच्यामार्फत)
९. कार्यासन, आस्था-२, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१०. कार्यासन, योजना-३, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
११. निवड नस्ती (आस्था-३), ग्राम विकास व जलसंधारण विभाग